**महासंचालक (न्यायिक व तांत्रिक) यांचे अधिनस्त न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील उप संचालक, गट-अ या पदावर पदोन्नतीने नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र. एफएसएल-०४१५/प्र.क्र.१४२/पोल-४,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :-२५ ऑक्टोबर, २०१६.

संदर्भ :- महासंचालक (न्यायिक व तांत्रिक) , न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक- मुं /गो/९९/२०१५, दिनांक -१९.०३.२०१५.

**शासन निर्णय :-**

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक) यांचे अधिनस्त न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील उप संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, गट-अ ( वेतनश्रेणी रू.१५६००-३९१०० + ग्रेड पे रू.६९००) या संवर्गातील पदावर खाली दर्शविल्याप्रमाणे अधिकाऱ्यांची तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र | ज्येष्ठता क्र. | अधिकाऱ्यांचे नांव व प्रवर्ग | निवडसूचीवरील समावेशनाचा प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसूल विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | ५ | श्री.ल.भा. रेवतकर (इ.मा.व.) | खुला | नागपूर | प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नागपूर |
| २ | ७ | श्री. ना.क. राठोड (वि.जा.-अ) | विजाअ- | औरंगाबाद | प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा नांदेड, |
| ३ | ९ | श्रीमती चि.सं.कामत (अ.जा.) | अ.जा. | कोकण | न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई |
| ४ | ३३ | श्री.रा.रा.पवार (अ.ज.) | अ.ज. | कोकण | न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई |

२. सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपाची असून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नती उपरोक्त नमूद अधिका-यांविरूध्द विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही, या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. पदोन्नत झालेल्या अधिका-याने त्यांच्या पदोन्नतीचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून सात दिवसांच्या आत पदोन्नतीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत तर त्यांना पदोन्नती नको, असे समजून शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/१२, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

५. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी पदोन्नत झालेल्या वरील अधिका-यास स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधीत अधिकाऱ्यास सूचना द्याव्यात. तसेच संबंधीत अधिकाऱ्याने पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल न चुकता संचालनालयामार्फत शासनास सादर करावा.

६. पदोन्नत अधिका-याने त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये, यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.०८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे.

७. उमेदवाराची पदस्थापना सदर शासन निर्णयात दर्शविण्यात आलेल्या ठिकाणीच करण्याची दक्षता महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी घ्यावी.

८. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२६ अे/१६,का.१६ब, दि.१६.५.२०१६ व अनौपचारिक संदर्भ क्र.८०९/२०१६/का.१२, दि.०९.०६.२०१६ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१६१०२६१३११०१२६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Somnath V Potare

Digitally signed by Somnath V Potare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d677dcd1bc3bed55a48ddbdaad925a6651c5d43a12d84cf305d3ff791ea7f16, cn=Somnath V Potare
Date: 2016.10.26 15:51:24 +05'30'

**( सोमनाथ पोटरे )**
अवर सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
४. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (गृह), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२/कार्यासन-१६ ब), मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,नांदेड,मुंबई
१२. संबंधित पदोन्नत उपसंचालक (संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या मार्फत).
१३. निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).